रस्ता सुरक्षा निधीमधून करावयाच्या खर्चाच्या प्रस्तावाबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन निर्णय क्रमांकः एमव्हीआर-०८१७/प्र.क्र.४०१/परि-२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १८ डिसेंबर, २०१८.

**संदर्भ** :- १) शासन निर्णय क्र.एमव्हीआर-०८१६/प्र.क्र.४५७/परि-२, दि. ०९ फेब्रुवारी, २०१७.
२) शासन निर्णय क्र.एमव्हीआर-०७१६/प्र.क्र.३२४/परि-२, दि. ०१ सप्टेंबर, २०१६.
३) शासन अधिसूचना क्र.एमव्हीआर-०७१६/प्र.क्र.३२४/परि-२, दि. १७ ऑक्टोबर, २०१६.
४) परिवहन आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र.का-४/न.क्र.१९७/२०१८/जा.क्र.१६५२५, दि.०३.१२.२०१८.

**प्रस्तावना :**

मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका क्र.२९५/२०१५ यामध्ये रस्ता सुरक्षा विषयक बाबींचा वेळोवेळी आढावा घेऊन मा.सर्वोच्च न्यायालयास अहवाल सादर करण्यासाठी रस्ता सुरक्षा समितीची स्थापना केली आहे. सदर समितीने रस्ता सुरक्षाविषयक कामकाजासाठी स्वतंत्रपणे रस्ता सुरक्षा निधी निर्माण करण्याचे आदेश दिलेले आहेत. त्यानुसार रस्ता सुरक्षासंदर्भात विविध प्रकल्पांना मान्यता देण्याकरीता संदर्भाधिन क्र. २ येथील दि.०१.०९.२०१६ च्या शासन निर्णयान्वये "रस्ता सुरक्षा निधी नियंत्रण समिती" स्थापित करण्यात आलेली आहे.

वरील प्रयोजनासाठी संदर्भाधिन क्र.३ येथील दि.१७.१०.२०१६ च्या अधिसूचनेन्वये उपकराची आकारणी करण्यात येत आहे. तसेच निधीच्या प्रयोजनासाठी संदर्भाधिन क्र.१ येथील दि.०९.०२.२०१७ च्या शासन निर्णयान्वये परिवहन आयुक्त यांच्या स्तरावर स्वीय प्रपंजी लेखा खाते (P.L.A.) उघडण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार रस्ता सुरक्षेच्या विविध उपक्रमांना वित्तीय व प्रशासनिक मान्यता देण्याकरीता व उक्त प्रयोजनासाठी स्वीय प्रपंजी लेखा खात्यात तरतूद वर्ग करण्याचा प्रस्ताव परिवहन आयुक्त यांनी संदर्भाधिन क्र.४ नुसार शासनास सादर केला असून सदर बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

मा.सर्वोच्च न्यायालयाच्या रस्ता सुरक्षा समितीने दिलेल्या निर्देशानुसार रस्ता सुरक्षा संदर्भात विविध प्रकल्पांना मान्यता देण्याकरीता मा.मुख्यसचिव यांच्या अध्यक्षतेखाली "रस्ता सुरक्षा निधी नियंत्रण समिती" स्थापित करण्यात आलेली आहे. उक्त समितीने मान्यता दिलेल्या खालील रु.४७,१९,००,०००/-(रू.सतेचाळीस कोटी एकोणविस लक्ष मात्र) इतक्या रकमेच्या खर्चाच्या प्रस्तावास प्रशासकीय व वित्तीय मंजूरी देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **विभाग** | **प्रस्तावावरील खर्च (रू.लक्ष)** |
|---|---|---|
| १ | मुंबई वाहतूक पोलीस विभाग | ११७०.०० |
| २ | महामार्ग पोलीस विभाग | १५४५.०० |
| ३ | आरोग्य विभाग | ४.०० |
| ४ | परिवहन विभाग | २०००.०० |
| | एकूण | ४७१९.०० |

२. उपरोक्तप्रमाणे रस्ता सुरक्षा निधीच्या प्रयोजनासाठी अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतूदीपैकी रू. १४,७३,७६,८५८/- ( अक्षरी रुपये चौदा कोटी त्र्याहात्तर लक्ष शहात्तर हजार आठशे अठावण्ण फक्त) एवढी तरतूद भारतीय रिझर्व्ह बँक मुंबई येथे परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे नावे उघडण्यात आलेल्या स्विय प्रपंजी लेखा खाते (PLA A/c) क्र. ०१५१४८०१०४१ कोड नंबर २१६७ यामध्ये वर्ग करण्यास खालील अटीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१) सदरची तरतूद ही संदर्भाधिन क्र.१ येथील दि.०९.०२.२०१७ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटी व शर्तीनुसार खर्च करण्यात यावा.

२) सदर अनुदानाच्या रकमेचे स्वतंत्र लेखे ठेवण्यात यावेत.

३) सदर अनुदानाचे उपयोगीता प्रमाणपत्र विहित नमून्यात शासनाला सादर करावे. तसेच उपयोगिता प्रमाणपत्राच्या प्रती महालेखापालांनाही पाठवाव्यात.

४) सदर अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ४०५ /व्यय-८, दि.१२/१२/२०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२१८११२९०३६९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ghiratkar Nitin Jyotinath

Digitally signed by Ghiratkar Nitin Jyotinath
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bbb712ac44dfd391a1a4d7d8b24cf743fa81a59477dff3f6805f105ac91db1e0, cn=Ghiratkar Nitin Jyotinath
Date: 2018.12.18 12:48:23 +05'30'

**( नि.ज्यो.घिरटकर )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई
२) सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री, मंत्रालय, मुंबई
३) मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
४) मा. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
५) मा. उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
६) मा. उपसभापती,विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
७) मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा) यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
८) मा. विरोधी पक्षनेता (विधानपरिषद) यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
९) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
११) महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई,
१२) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१
१५) वित्त विभाग (व्यय ८/कोषा ५/ अर्थसंकल्प १०) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१६) गृह विभाग (बीयुडी १/बीयुडी २/परिवहन ४) मंत्रालय, मुंबई
१७) निवडनस्ती/परि- २.